संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
आणि विमा संचालक, यांना अधिकार
प्रदान करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,

**2 DEC 1987**

निर्णय क्रमांक : विअप्र १०८७/(१३३)/कोषागारे-६,
मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
दिनांक :

शासनाने वेळोवेळी अनेक आदेश काढून मंत्रालयातील प्रशासकीय विभाग/विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख /कार्यालय प्रमुख यांना वित्तीय व प्रशासकीय अधिकार प्रदान केलेले आहेत. प्रशासनामध्ये अधिक कार्यक्षमता आणण्याच्या दृष्टीने आणि विकास योजना परिणामकारकरित्या कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने व प्रशासकीय अधिकाऱ्यांना त्यांची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या अधिक परिणामकारक रितीने व जलद गतीने पार पाडता याव्यात म्हणून वित्त विभागाला प्रदान करण्यात आलेल्या काही शक्ती, वित्त विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभाग प्रमुखांना वगैरे प्रदान करण्याचा प्रस्ताव प्रशासकीय शक्तीचे प्रदान करण्यासाठी नियुक्त केलेल्या सचिव समितीसमोर विचारार्थ व शिफारशीसाठी सादर करण्यात आले होते सदर सचिव समितीने या संबंधात केलेल्या शिफारशी विचारात घेऊन त्याप्रमाणे वित्त विभागाच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुखांना वगैरे प्रशासकीय शक्ती प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या काही काळ विचाराधीन होता.

<u>निर्णय</u> :-

प्रशासकीय शक्तीचे प्रदान करण्यासाठी नियुक्त केलेल्या सचिव समितीने केलेल्या शिफारशी विचारात घेऊन शासन असा आदेश देत आहे की, संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई आणि विमा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई तसेच त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील प्रादेशिक विभाग प्रमुखांना या निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये दर्शविल्याप्रमाणे प्रशासकीय अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

या निर्णयाद्वारे प्रदान केलेल्या शक्तींचा वापर हा तत्संबंधीचे नियम व विनियम यामध्ये समाविष्ट केलेल्या किंवा तत्संबंधी अमलात असलेल्या वा येणाऱ्या आदेशांच्या अधीन राहील.

...२/-

जेथे एखाद्या अधिका-याचे विद्यमान प्रशासकीय अधिकार इतर कोणत्याही शर्तींच्या दृष्टीने अधिक उदार असतील तेथे असे अधिकार ज्या प्रशासकीय शर्तींच्या अधीन प्रदान करण्यात आले असतील त्या शर्तींच्या अधिन ते अधिकार या पुढेही अंमलात राहतील असे मानले जावे.

ज्या विभाग प्रमुखांना व इतर प्राधिका-यांना या आदेशान्वये तसेच वेळोवेळी काढलेल्या आदेशान्वये अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत त्यांनी अशा प्रकारे प्रदान केलेल्या अधिकाराच्या स्तरावर कोणताही हस्तक्षेप, भीती अथवा अनुग्रह याशिवाय त्याचा पूर्णपणे व परिणामकारकपणे वापर करण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

संबंधीत नियमपुस्तिकामध्ये जेथे सुधारणा आवश्यक असेल अशा आवश्यक सुधारणा यथावकाश करण्यांत येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( व. अ. पंडित )
शासनाचे उप सचिव.

सहपत्र : विवरणपत्र.

प्रति,

महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल, (लेखा परीक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२ महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
(महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.)
सर्व जिल्ह्यांचे जिल्हा कोषागार अधिकारी
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
वित्त मंत्री यांचे स्वीय सहाय्यक
राज्यमंत्री (वित्त) यांचे स्वीय सहाय्यक
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभागांचे सचिव,
उप संचालक, लेखा व कोषागारे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/ पुणे
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
कार्यासन कोषागारे-१,३,५ वित्त विभाग.
कार्यासन अधिकारी, सेवा-२,३ यांना माहितीसाठी व सेवा नियमांतील परिशिष्टामध्ये आवश्यक तेथे योग्य त्या सुधारणा करण्याच्या विनंतीसह
निवड नस्ती, कार्यासन कोषागारे-६, वित्त विभाग.

शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वि. [illegible] ०८७/[१३३]/कोषागारे-६ दिनांक २ [illegible]बर १९८७ चे जोडपत्र

संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्रदान करावयाच्या प्रशासकीय अधिकारांसंबंधीचे विवरणपत्र.

| अनुक्रमांक | शक्तीचे स्वरूप | अधिकारांचा वापर करणारा सक्षम अधिकारी | प्रदान केलेल्या अधिकारांच्या मर्यादा. | प्रदानासंबंधीच्या अटी |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| १. | शासकीय विम्या संबंधात कामाच्या संबंधी व्यावसायिक सर्वेक्षक [सर्व्हेअर] वसुली एजंट, अन्वेषक आणि मूल्यांकन करणारा/किंमत ठरविणारा अधिकारी नेमणे. | संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | पूर्ण अधिकार | १. विहित नियमाच्या अटींच्या/शर्तींच्या अधिन राहून<br>२. संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांच्या अधिपत्याखालील उप संचालक, सहाय्यक संचालक यांना या शक्तीचे पुन: प्रत्यायोजन करण्याबाबत कार्यवाही करावी. |

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-१०८७/[१३३]/कोषागारे-६, दिनांक २ डिसेंबर, १९८७ चे जोडपत्र

संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्रदान करण्यात आलेल्या

प्रशासकीय शक्तींचे विवरणपत्र.

| अनु-क्रमांक | नियम क्रमांक | शक्तींचे स्वरुप | अधिकारांचा वापर करणारा सक्षम अधिकारी. | प्रदान केलेल्या अधिकारांच्या मर्यादा | प्रदानासंबंधिच्या अटी |
|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| १. | महाराष्ट्र नागरी सेवा [पदग्रहण अवधी स्वियेतर सेवा इत्यादी] नियम, १९८१, [वित्तीय प्रकाशन क्रमांक ३] मधील नियम क्रमांक ३६[२] आणि नियम क्रमांक ५४ | १. महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा वर्ग-२ संवर्गातील अधिकाऱ्यांची महाराष्ट्र राज्यामध्ये स्वीयेत्तर सेवेमध्ये बदली करणे. | संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा वर्ग-२ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या संदर्भात पूर्ण अधिकार. | १. महाराष्ट्र नागरी सेवा [पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा इत्यादी] नियम १९८१ च्या परिशिष्ट दोन मध्ये विहित केलेल्या अटींच्या व शर्तींच्या अधिन राहून.<br>२. महाराष्ट्र नागरी सेवा [पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा इत्यादी] नियम १९८१ च्या परिशिष्ट ३ मधील मार्गदर्शक तत्वांच्या अधिन राहून.<br>३. महाराष्ट्र नागरी सेवा [पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा] नियम १९८१ मधील प्रतिनियुक्तीसंबंधीच्या नियमांच्या अधिन राहून.<br>४. प्रतिनियुक्तीचा एकंदर कालावधी ४ वर्षांपेक्षा जास्त नसावा. |

| अनु. क्रमांक | नियम क्रमांक | शक्तींचे स्वरूप | अधिकारांचा वापर करणारा सक्षम अधिकारी | प्रदान केलेल्या अधिकारांच्या मर्यादा. | प्रदानासंबंधीच्या अटी |
| --- | --- | --- | --- | --- | --- |
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| | | | | | ५. ज्या प्रकरणी संबंधीत नियम/अटी शर्ती शिथिल करणे आवश्यक असेल अशी प्रकरणे नेहमीप्रमाणे वित्त विभागाकडे पाठविण्यांत यावीत. |
| | | | | | ६. प्रतिनियुक्तीसंबंधी अस्तित्वांत असलेल्या/ येणा-या इतर प्रशासकीय आदेशांच्या अधिन राहून. |
| | महाराष्ट्र नागरी सेवा [पद-ग्रहण अवधी स्वियेतर सेवा इत्यादी] नियम १९८१ [वित्तीय प्रकाशन क्रमांक ३] मधील नियम क्रमांक ३६[२] आणि नियम क्रमांक ५४ | २. महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा वर्ग-२ संवर्गातील आधीच प्रतिनियुक्तीवर असलेल्या अधिका-यांकडून त्यांच्या संवर्गातील प्रत्या-वर्तनासंबंधी नोटीस स्विकारणे. | संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | पूर्ण अधिकार | विहित नियम व अटी व शर्ती यांच्या अधीन राहून. |
| | | ३. महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा वर्ग-२ संवर्गातील परंतु स्वीयेतर सेवेमध्ये प्रतिनियुक्तीवर असलेल्या अधिका-यांना शासन सेवेत परत बोलावणे. | संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई. | पूर्ण अधिकार | विहित नियम व अटी व शर्ती यांच्या अधीन राहून. |

| अन. क्रमांक | नियम क्रमांक | शक्तींचे स्वरूप | अधिकारांचा वापर करणारा सक्षम अधिकारी | प्रदान केलेल्या अधिकाराच्या मर्यादा. | प्रदानासंबंधीच्या अटी. |
| --- | --- | --- | --- | --- | --- |
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
| २. | महाराष्ट्र नागरी सेवा [वेतन] नियम १९८१ मधील नियम क्रमांक ३९. | महाराष्ट्र नागरी सेवा [वेतन] नियम १९८१ च्या नियम ३९[५] अन्वये, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा वर्ग-२ संवर्गातील महाराष्ट्र राज्यांत स्वियेतर सेवेमध्ये प्रति-नियुक्तीवर असलेल्या अधिका-यांची संवर्गबाह्य पदावरील प्रतिनियुक्ती कालामधील सेवा वेतनवाढीकरिता हिशोबात धरण्यासाठी आवश्यक ते प्रमाणपत्र देण्याबाबत. | संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | पूर्ण अधिकारी | यासंबंधीच्या संबंधीत नियमांच्या व त्यातील अटींच्या व शर्तींच्या अधीन राहून. |
| ३. | महाराष्ट्र नागरी सेवा [वेतन] नियम, १९८१ मधील नियम क्रमांक ५६ | महाराष्ट्र वित्त व लेखासंवर्गातील राजपत्रित अधिका-यांना अतिरिक्त वेतन/विशेष वेतन मंजूर करणे. | १. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | वित्त व लेखा सेवा वर्ग-१ [कनिष्ठ] व वर्ग-२ [कनिष्ठ] संवर्गातील अधि-का-यांपुरते पूर्ण अधिकार. | विहित नियमांच्या अटींच्या व शर्तींच्या अधीन राहून. |
| | | | २. प्रादेशिक विभाग | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा वर्ग-२ संवर्गातील त्यांच्या प्रशासकीय | |

| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. |
|---|---|---|---|---|---|
| | | | | नियंत्रणाखाली असलेल्या अधिका-यांपुरते मर्यादित | |

टीप :– १] प्रदानासंदर्भातील सर्वसाधारण नियमांतील तरतुदी ज्या प्रकरणी पूर्ण होत नसतील अशी प्रकरणे वित्त विभागाकडे पाठवावीत.

२] अधिकार प्रदानासंबंधीचे नियम, विनियम व आदेश यांतील अटींच्या अधीन राहून वर प्रदानित केलेल्या अधिकारांचा वापर करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे हे प्रकर्षाने लक्षांत घ्यावे.